भारतीय नागरी सुरक्षा संहिता-२०२३ च्या अंमलबजावणीकरिता महाराष्ट्र राज्यात मोबाईल फॉरेन्सिक वाहनांचा संपूर्ण प्रकल्प राबविण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक एफएसएल-०४२४/प्र.क्र.२०५/पोल-४,**
मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
दिनांक :- २२ मे, २०२५

संदर्भ :- १) शासन निर्णय समक्रमांक दि.२२.०७.२०२४
२) उच्च स्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.३०.०९.२०२४ व दि.०९.०४.२०२५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
३) महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), यांचे पत्र क्र.महासंचालक/२३२/२०२५, दि.१०.०३.२०२५.
४) न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाचे पत्र क्र.मुं/का/५०१६-१७/२५, दि.१६.०५.२०२५.

**प्रस्तावना -:**

भारतीय नागरिक सुरक्षा संहिता २०२३ मधील १७६ (३) मधील तरतुदीच्या अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने सात वर्षे किंवा त्यापेक्षा जास्त शिक्षा असलेल्या गुन्ह्यांमध्ये न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा तज्ञांकडून घटनास्थळांवर भेट देवून परिस्थितीजन्य पुरावे गोळा करणेसाठी घटनास्थळाला भेट देण्यासाठी २५४ मोबाईल फॉरेन्सिक व्हॅन्स खरेदी करण्याकरीता आणि २५९ वाहनांसाठी आवश्यक मनुष्यबळ पुरवठा, फॉरेन्सिक किट्स, रसायने खरेदी तसेच, सॉफ्टवेअर आणि जोडणी यासाठीच्या अंदाजे रू.१३७२.३६ कोटीच्या प्रकल्पास संदर्भाधीन क्र.१ वरील दिनांक २२.०७.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये तत्वतः मान्यता देण्यात आली होती. तथापि, न्युनतम निविदेचा देकार अधिक असल्याने तडजोडी अंती रु.१३८६.२२ कोटी इतक्या रकमेची निविदा अंतिम करण्यास विहित कार्यपध्दतीने मान्यता देण्यात आली.

तसेच, या प्रकल्पांतर्गत पहिल्या टप्प्यात प्रायोगिक तत्वावर २१ मोबाईल फॉरेन्सिक व्हॅन्स [मुंबई शहर-०५ (निर्भया अंतर्गत प्राप्त वाहने), नवी मुंबई-०३, नागपूर शहर-०५, आणि जळगांव-०८] वापरण्यास मंजूरी, १६ नवीन वाहनांची खरेदी तसेच २१ वाहनांची देखभाल व दुरुस्ती, इंधन, मनुष्यबळ, किट्स, सॉफ्टवेअर इ. अनुषंगिक बाबींसह अंदाजे रु. ३२.०३ कोटी इतक्या खर्चासही मंजूरी देण्यात आलेली आहे.

यासंदर्भात अप्पर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ३०/०९/२०२४ रोजी आयोजित उच्चस्तरीय शक्ति प्रदत्त समितीच्या बैठकीमधील निर्णयानुसार न्युनतम निविदाकार M/s CMS Computers India Pvt. Ltd. यांचेसोबत दिनांक ०८.१०.२०२४ रोजी करारनामा करण्यात आला व त्यानंतर न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या दिनांक २०.१२.२०२४ रोजीच्या आदेशान्वये कार्यारंभ आदेश देण्यात आले.

वरील सर्व मान्यतेस अनुसरुन दिनांक २७.०१.२०२५ रोजी पायलट प्रकल्पातील एकूण १६ मोबाईल फॉरेन्सिक व्हॅन्सचे लोकार्पण करण्यात आले आहे. तसेच निर्भया योजने अंतर्गत बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालयाकडून ५ फॉरेन्सिक व्हॅन्स उपलब्ध करुन देण्यात आल्या आहेत.

दिनांक २२.०७.२०२४ रोजीच्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार प्रायोगिक तत्वावरील वाहनांचा प्रत्यक्ष वापर केल्यानंतर होणा-या फलनिष्पत्तीचा किंवा परिणामांचा विचार करून उर्वरित प्रकल्पात आवश्यकता असल्यास काही सुधारणा करून संपूर्ण प्रकल्प राबविण्याचे निश्चित करण्यात आले होते. याबाबत दिनांक ०९.०४.२०२५ रोजी पार पडलेल्या उच्चस्तरीय समितीच्या बैठकीमधील मान्यतेनुसार प्रायोगिक तत्वावरील प्रकल्पाचा फलनिष्पत्ती अहवाल विचारात घेऊन मोबाईल फॉरेन्सिक व्हॅनच्या संपूर्ण प्रकल्पाची अंमलबजावणी एक वर्षाऐवजी पुढील ६ महिन्यांच्या कालावधीत अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाने संदर्भ क्र.४ मध्ये नमुद केलेला प्रस्ताव व फलनिष्पत्ती अहवाल व त्यासमवेतचे पुरवठादार कंपनीचे सहमतीपत्र विचारात घेता खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्यात मोबाईल फॉरेन्सिक वाहनांचा रु.१३८६.२२ कोटी इतक्या खर्चाचा प्रकल्प संपूर्ण क्षमतेने राबविण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर प्रकल्पांतर्गत उर्वरीत २३८ मोबाईल फॉरेन्सिक वाहन खरेदी, मनुष्यबळ पुरवठा, फॉरेन्सिक किट्स आणि रसायने खरेदी तसेच, सॉफ्टवेअर आणि जोडणी याबाबतची संपूर्ण कार्यवाही करताना उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि.०१.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीचे व विहित कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

२) पुरवठादार कंपनीने सुधारीत कालमर्यादेत विहित मान्यतेनुसार परिपुर्ण परिस्थितीत सुविधा, तंत्रज्ञान पुरवठा व तांत्रिक मनुष्यबळासह फॉरेन्सिक मोबाईल व्हॅन्स कार्यान्वित करणे बंधनकारक राहील.

३) सदर प्रकल्पासाठीच्या संदर्भाधीन क्रमांक १ वरील दिनांक २२.०७.२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील लेखाशिर्ष व उर्वरीत तरतूदी/अटी/शर्ती कायम राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०५२२१३३२५६०६२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
Date: 2025.05.22 13:47:07 +05'30'

**(अर्चना वालझाडे)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा. सभापती, महाराष्ट्र विधापरिषद यांचे सचिव
३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसमा यांचे सचिव
४) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
६) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७) सर्व सन्मानीय संसद/विधानसभा/ विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक
८) मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१०) अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
११) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१२) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक
१३) महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४) प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१५) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई

१६) उप संचालक, प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, पुणे/ नागपूर/ नाशिक/औरंगाबाद/नांदेड/अमरावती/कोल्हापूर
१७) लघु न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, चंद्रपूर/धुळे/ठाणे/रत्नागिरी/ सोलापूर
१८) अधिदान व लेखा अधिकारी/निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/नाशिक/औरंगाबाद/ नांदेड/अमरावती/ कोल्हापूर/चंद्रपूर/धुळे/ठाणे/रत्नागिरी/सोलापूर
२०) मेसर्स सी.एम.एस.कॉम्प्युटर इंडिया प्रा.लि.
२१) निवडनस्ती (पोल-४)